सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास योजनेअंतर्गत प्राप्त प्रस्तावाला निधी वितरीत करण्याबाबत. (पोखरण लेक स्मॉल स्केल इंडस्ट्रीज असोसिएशन,उपवन,ठाणे.)

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.औपासू- २०२१/ प्र.क्र.१७१/ उद्योग-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २५ जानेवारी, २०२२

वाचा :- १) शासन निर्णय क्र. आयआयआय पॉलिसी २०१०/प्र.क्र.७६८/उद्योग-२, दि.२२/०२/२०१३.
२) शासन निर्णय क्र.औपासू २०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५/०२/२०१४.
३) शासन शुध्दीपत्रक क्र.औपासू-२०१६/प्र.क्र.२१९/उद्योग-२, दि.२०/१२/२०१६.
४) सुकाणू समितीच्या सातव्या बैठकीचे इतिवृत्त दि.२२/०३/२०२१
५) उद्योग उप संचालक (साप्रयो), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ साप्रोयो/ पायाभूत सुविधा/ पोखरण लेक/२०२१/ अे-९१४, दि. ११/१०/२०२१.
६) शासन निर्णय क्र. औपासू-२०२१/प्र.क्र.१७१/उद्योग-२, दि. ०४/०१/२०२२

**शासन निर्णय:-**

औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास या योजनेअंतर्गत स्थापित मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली सुकाणू समितीने दिनांक २२/०३/२०२१ रोजी झालेल्या सातव्या बैठकीमध्ये पोखरण लेक स्मॉल स्केल इंडस्ट्रीज असोसिएशन,उपवन,ठाणे येथे एक्सप्रेस फिडर बसविण्याच्या कामास मंजूरी दिलेली आहे. तद्अनुषंगाने सदर कामाकरीता दिनांक ०४/०१/२०२२ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रकल्पासाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी लिमिटेड (MSEDCL) ही कार्यान्वयन यंत्रणा आहे. पोखरण लेक स्मॉल स्केल इंडस्ट्रीज असोसिएशन, उपवन, ठाणे येथील प्रस्तुत कामास शासन हिस्स्याची १०० टक्के म्हणजेच रुपये ३,६१,४७,०००/- (रुपये तीन कोटी एकसष्ट लाख सत्तेचाळीस हजार फक्त) इतकी रक्कम विकास आयुक्त(उद्योग) यांनी आहरण करुन महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी लिमिटेड (MSEDCL) या कार्यान्वयन यंत्रणेकडे सुपूर्द करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | औद्योगिक वसाहत | प्रस्तावातील कामाची मूळ किंमत | प्रशासकीय मंजूरी |
|---|---|---|---|
| १. | पोखरण लेक स्मॉल स्केल इंडस्ट्रीज असोसिएशन, उपवन, ठाणे येथे एक्सप्रेस फिडर बसविणेबाबत. | रुपये ३६१.४७ लाख | रुपये ३६१.४७ लाख (१००%) |

२. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्र.के-१०, मुख्य लेखाशिर्ष ४८७५- इतर उद्योगांवरील खर्च, उप लेखाशिर्ष ६० - इतर उद्योग, ८०० - इतर खर्च, ८००(००)(०१), औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास (कार्यक्रम)(४८७५ ००२५) या योजनेखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास योजनेच्या अनुषंगाने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयामध्ये नमूद कार्यपध्दती व मार्गदर्शक तत्त्वांचे तसेच यामध्ये करण्यात आलेल्या सुधारणा यांचे पालन करणे आहरण व संवितरण अधिकारी तसेच कार्यान्वयन यंत्रणा यांच्यावर बंधनकारक आहे.

४. सदर प्रकल्पाचे काम पूर्ण होईपर्यंत झालेल्या खर्चातील वाढ (Cost Escalation) महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी लिमिटेड (MSEDCL) मार्फत भागविण्यात यावा.

५. सदर प्रकल्पाकरीता शासनाच्या अन्य विभाग अथवा संस्थांकडून खर्च झालेला नाही याची खातरजमा महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी लिमिटेड (MSEDCL) यांनी करावी.

६. विकास आयुक्त (उद्योग) यांनी प्रस्तुत प्रकल्पाकरीता अदा करण्यात आलेल्या निधीसंदर्भातचे उपयोगिता प्रमाणपत्र व प्रकल्प पूर्तता अहवाल शासनास सादर करावे.

७. प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. १५७/१४६१ दि. २९/११/२०२१ त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २७५/२०२१/व्यय-१६ दि.२०/१२/२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२२०२०११४५५३०२५१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRY, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2022.02.04 16:26:27 +05'30'

**(संजय देगांवकर)**
**सह सचिव (उद्योग), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), नागपूर.
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई.
५) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-४०० ०३२.
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी लिमिटेड,बांद्रा पूर्व मुंबई.
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी लिमिटेड, मुंबई,
८) संबंधित औद्योगिक वसाहत (उपरोक्त नमूद) (मार्फत विकास आयुक्त, उद्योग).
९) वित्त विभाग (कार्यासन अर्थसंकल्प-१४/ व्यय-१६), मंत्रालय, मुंबई.
१०) नियोजन विभाग (कार्यासन-१४६१), मंत्रालय, मुंबई.
११) अवर सचिव (प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती (उद्योग-२).